4

20140820152311 9823

**रायगड जिल्ह्यातील निरनिराळया पर्यटनस्थळ विकासासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक टीडिएम २००९/१२/प्र.क्र.४३४/पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक - १६/१२/२००९**

**वाचा :- जिल्हाधिकारी रायगड यांचे पत्र क्र.नियोजन/का.५/प्रा.पर्यटन/११५१/२००९/१०, दि. १२/०८/२००९**

**शासन निर्णय :**

पर्यटन स्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत रुपये ८४५०.०० लाख इतकी तरतूद सन २००९-१० मध्ये अर्थसंकल्पित झाली आहे. सदर तरतूदीतून रुपये २५४० लाख महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केली आहे. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केलेल्या रक्कमेतून मराठवाडा विकास कार्यक्रमाअंतर्गत रुपये ६००.०० लाख, अण्णाभाऊ साठे, वाटेगांव, जिल्हा सांगली येथे शिल्पसृष्टी उभारण्यासाठी रुपये २९.४६ लाख, ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले, नायगांव, जिल्हा सातरा येथे शिल्पसृष्टी उभारण्यासाठी रुपये ४६.१२ लाख व महामंडळची स्वतःची कामे करण्यासाठी वितरीत केलेली रक्कम रुपये ६३७.५० लाख अशी एकूण रुपये १३१३.०८ लाख निधी वजा जाता रुपये १२२६.९२ लाख निधी शिल्लक राहतो. (रुपये २५४०.०० लाख वजा रुपये १३१३.०८ लाख) आता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाकडे शिल्लक असलेल्या रुपये १२२६.९२ लाख इतक्या निधीतून रायगड जिल्ह्यातील खाली नमूद केलेल्या कामांना याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे व त्यासाठी सन २००९-१० या वर्षाकरिता रुपये १००.०० लाख इतका निधी जिल्हाधिकारी, रायगड यांना उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देण्यात येते.

**(रुपये : लाखात)**

| अनु क्र. | कामाचे नांव | अंदाजित किमंत | वितरीत निधी | कार्यान्वित यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |
| १) | **अ) होराई ता. सुधागड पर्यटन स्थळांचा विकास** | २५.०० | **१२.००** | **सा.बा.वि., महाड** |
| | **ब) कुडा येथे पर्यटक निवास बांधणे** | २०.०० | | |
| २) | **माथेरान गिरीस्थान नगर परिषद** | | | |
| | अ) यु. डी. ६ (अ) योजने अंतर्गत गार्डनमध्ये खेळणी व बेंचेस | १०.०० | **२०.००** | **नगर परिषद माथेरान** |
| | ब) पर्यटकांच्या विश्रांती करिता बेंचेस बसविणेबाबत. | १०.०० | | |
| | क) फॉरेस्ट पार्कचे नुतनीकरण त्वरीत करणेबाबत | १५.०० | | |
| | ड) माथेरान गिरीस्थान हद्दीतील पॉईटवर [illegible] निर्माण करणेबाबत | ६.०० | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३) | **माची प्रबळ पर्यटन क्षेत्र** | | | |
| | अ) पाणी पुरवठा करणे | ३.०० | | |
| | ब) स्वच्छतागृहाचे बांधकाम करणे | ५.०० | **२८.००** | |
| | क) वाहनतळाचे बांधकाम करणे | ८.०० | | |
| | ड) पाण्याच्या कुंडाचे बांधकाम करणे | ५.०० | | **सा.बां.वि., अलिबाग विभाग** |
| | इ) भक्त निवास बांधणे | १५.०० | | |
| | ई) स्वागत कमान व संरक्षक भिंत बांधणे | ८.०० | | |
| | उ) पायवाट रस्त्याची सुधारणा करणे | ५.०० | | |
| | ऊ) पावसाळी धबधब्यापर्यंत रस्ता करणे | ४.०० | | |
| ४) | **उन्हेरे येथील गरम पाण्याच्या कुंडाची सुधारणा करणे** | | | |
| | अ) उन्हेरे येथील गरम पाण्याच्या कुंडाकडील रस्त्याचे रुंदीकरण व डांबरीकरण | १५.०० | | |
| | ब) उन्हेरे येथील गरम पाण्याच्या कुंडाची आरसीसी बांधकाम करुन सुधारणा करणे | २५.०० | **४०.००** | **सा. बां. वि., महाड विभाग** |
| | क) उन्हेरे येथील गरम पाण्याच्या कुंडाच्या ठिकाणी सुसज्य अशी धर्मशाळा बांधणे | १५.०० | | |
| | ड) पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करणे | २०.०० | | |
| ५) | **अ) माणगांव तालुक्यातील कुडा लेण्याकडे जाणाऱ्या रस्त्याचे बांधकाम करणे कि.मी. ०/०० ते १/००** | २५.०० | | |
| | ब) माणगांव तालुक्यातील कुडा लेण्याच्या परिसरात संरक्षक भिंतीचे बांधकाम करणे | २५.०० | | |
| | क) पाचाड येथे पर्यटकासाठी निवासस्थानाचे बांधकाम करणे, ता. महाड | २५.०० | | |
| | ड) पाचाड येथे पर्यटकासाठी प्रसाधनगृहाचे बांधकाम करणे, ता. महाड | २५.०० | | |
| | ई) रायगड किल्ल्यावर नातेखिंड येथे सुशोभित कमानीचे बांधकाम करणे | २०.०० | | |
| | फ) पाचाड येथे जिजामाता समाधीकडे जाणाऱ्या रस्त्यावर सुशोभित कमानीचे बांधकाम करणे | २०.०० | | |
| | ज) पोलादपूर तालुक्यातील क्षेत्रपाल कुडपन रस्त्यावर कुडपन येथे कि.मी. २४/०० मध्ये पूल बांधणे | २५.०० | | |
| ६) | **श्रीवर्धन येथे समुद्रकिनाऱ्यावर पर्यटकांसाठी शौचालय, स्नानगृह बांधणे (स्त्री व पुरुष)** | २५.०० | | |
| | एकूण | ४०४.०० | १००.०० | |

वर नमूद केलेल्या कामांना जिल्हाधिकारी रायगड यांना वितरीत करण्यात येणाऱ्या रुपये १००.०० लाखाच्या तरतूदीस खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मंजूरी देण्यात येते.

**अटी व शर्ती :**

१) निधी प्रत्यक्ष उपलब्ध झाल्याशिवाय कामे सुरु करु नयेत तसेच वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांवर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च २०१० पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात प्रचलीत नियमानुसार तांत्रिक व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा करारांबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६) उपरोक्त सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटीं व शर्तींची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

७) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम / नगर परिषद विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी व ती इतरत्र वळविण्यात येऊ नये.

९) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

११) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर स्मारकाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची/नगर परिषदेची राहील.

१२) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २००९-१० या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष **"मागणी क्रमांक झेडड्डी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदाने"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. **या प्रकरणी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत) सहाय्यक अनुदानाच्या रक्कमेतून** जिल्हाधिकारी **रायगड यांना वितरीत करण्यात यावी.**

१३) हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, शासन निर्णय क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८, दि.१५ मे २००९ मधील अनु. क्र. ३ नियम क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(आ. बा. डमाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, सां.का-३, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.